**सन २०१८-१९ मधील अर्थसंकल्पीत तरतूदीचे वितरण करणेबाबत.**

डॉ. पंजाबराव देशमुख व्याज सवलत योजना (सर्वसाधारण) (२४२५१००९)

**महाराष्ट्र शासन**

**सहकार पणन व वस्त्रोद्योग विभाग**

**शासन निर्णय क्र.संकीर्ण १११८/ प्र.क्र. १४५/१८-स**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक : ६ फेब्रुवारी, २०१९

वाचा :-

१. सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग शासन निर्णय क्रमांक सीसीआर ०६१२/प्र.क्र.२६९/२-स, दिनांक ०६/०९/२०१२

२. वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०१८/प्र.क्र.६९/अर्थ-३, दिनांक ०२/०४/२०१८

३. वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.संकीर्ण-२०१६/प्र.क्र.३१/कोषा-प्रशा ५, दिनांक १०/०५/२०१६

४. सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, शासन निर्णय क्रमांक संकीर्ण १११८/प्र.क्र.१४५/१८-स, दिनांक ०१/१२/२०१८

५. सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, शासन शुध्दीपत्र क्रमांक संकीर्ण १११८/प्र.क्र.१४५/१८-स, दिनांक ११/१२/२०१८

६. वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०१८/प्र.क्र.६९/अर्थ-३, दिनांक २५/०१/२०१९

प्रस्तावना :-

राज्यातील शेतकऱ्यांना सहकारी कृषी पत संस्थांमार्फत व्याज दरात वसुलीशी निगडीत प्रोत्साहनात्मक सवलत देण्याचा निर्णय शासनाने दिनांक २४/११/१९८८ च्या शासन निर्णयान्वये घेतला आहे. त्यानुसार दिनांक ०२/११/१९९१ च्या शासन निर्णयानुसार डॉ. पंजाबराव देशमुख व्याज सवलत योजना दिनांक ०१/०४/१९९० पासून कर्ज घेतलेल्या शेतकऱ्यांना लागू करण्यात आली आहे. या योजनेअंतर्गत सहकारी कृषी पतसंस्थेकडून पीक कर्ज घेणाऱ्या व त्याची प्रतिवर्षी ३० जूनपर्यंत संपूर्ण परतफेड करणाऱ्या शेतकऱ्यांना व्याज सवलत देण्यात येत आहे. राष्ट्रीयकृत बँका, ग्रामीण बँका व खाजगी बँकांकडून कर्ज घेणाऱ्या शेतकऱ्यांनाही सदर योजना लागू आहे. मात्र थकीत कर्जास तसेच मध्यम मुदत व दीर्घ मुदत कर्जास सदरची योजना लागू नाही. या योजनेअंतर्गत शेतकऱ्यांना सहकारी कृषी पतसंस्थांमार्फत व बँकांमार्फत मिळणाऱ्या पीक कर्जावरील व्याज दराशी निगडीत व्याज सवलत देण्यात येत आहे. दिनांक ०३/१२/२०१२ रोजीच्या शासन निर्णयानुसार रूपये १.०० लाखापर्यंतच्या पीक कर्जावर वार्षिक ३% व त्यापुढील रूपये ३.०० लाखापर्यंतच्या पीक कर्जावर वार्षिक १% दराने व्याज सवलत लागू करण्यात आलेली आहे.

सन २०१८-१९ या चालू आर्थिक वर्षासाठी डॉ. पंजाबराव देशमुख व्याज सवलत योजनेअंतर्गत निधी मंजूर करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

<u>शासन निर्णय :-</u>

डॉ. पंजाबराव देशमुख व्याज सवलत योजनेअंतर्गत सन २०१८-१९ वर्षात अर्थसंकल्पीत रू.१५०८०.०० लाख तरतूदीपैकी रू.१०५५६.०० लाख एवढ्या निधीचे वितरण करून खर्च करण्यास वाचा मधील ४ व ५ येथील शासन निर्णय व शासन शुध्दीपत्रान्वये मान्यता देण्यात आली आहे. आता रू.१५०८.०० लाख (रू.एक हजार पाचशे आठ लाख) निधीचे वितरण करून खर्च करण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे.

२. वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०१८/प्र.क्र.६९/अर्थ-३, दि.२५/०१/२०१९ अन्वये अर्थसंकल्पीत तरतूदीच्या ८०% निधी वितरीत करण्यास विभागास अधिकार प्राप्त झाले आहेत. तसेच वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०१८/प्र.क्र.६९/अर्थ-३, दि.०२/०४/२०१८ च्या परिपत्रकातील परिच्छेद ७ ते ९ पैकी परिच्छेद ७ (१) (अ) वगळता इतर सर्व परिच्छेद या योजनेस लागू नाहीत. तसेच या परिशिष्टात नमूद केलेल्या सर्व संबंधित बाबींची पूर्तता होत आहे.

३. वरीलप्रमाणे मंजूर करण्यात आलेला निधी संबंधित बँका / संस्थांस वितरीत करताना आहरण व संवितरण अधिकारी यांनी सदर रकमेबाबत उपयोगिता प्रमाणपत्र प्राप्त करून घ्यावे व त्याची प्रत शासनास सादर करावी.

४. वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र. संकीर्ण-२०१६/प्र.क्र.३१/कोषा प्रशा-५, दि.१०/०५/२०१६ अन्वयेच्या परिशिष्टातील अनुक्रमांक १, २, ५, ६, ७ व ८ संदर्भात सदर योजना ही नियमित राज्य योजनेतर योजना असल्याने व "३३ - अर्थसहाय्य" याखाली निधी वितरीत होणार असल्याने नियोजन व वित्त विभागाच्या सहमतीची आवश्यकता नाही.

५. सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य कार्यालयाने वित्त विभागाच्या उपरोक्त वाचा क्र. ३ येथील शासन परिपत्रकामधील सूचनांचे पालन करावे.

६. वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०१८/प्र.क्र.६९/अर्थ-३, दिनांक ०२/०४/२०१८ मधील परिच्छेद "अ" नुसार या प्रकरणी माहिती खालीलप्रमाणे आहे :-

(१) **विभागास प्रदान वित्तीय अधिकार** :- वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०१८/प्र.क्र.६९/अर्थ-३, दिनांक २५/०१/२०१९ अन्वये अर्थसंकल्पीत तरतूदीच्या ८०% वितरीत करण्यास विभागास अधिकार प्राप्त झाले असून सदर परिपत्रकातील तपासणी सूचीप्रमाणे सर्व बाबींची सदर प्रकरणी पूर्तता होत आहे.

(२) **मंजूर निधी** :- या योजनेच्या लेखाशिर्षाखाली सन २०१८-१९ या वित्तीय वर्षासाठी रूपये १५०८०.०० लाख इतका निधी अर्थसंकल्पीत झालेला आहे.

(३) **यास्तव** मागील ३ महिन्यापूर्वी ७०% निधी (रूपये १०५५६.०० लाख) वाटप करण्यात आलेले आहे. तसेच सदर निधीचे विनियोग प्रमाणपत्रदेखील मागविण्यात आले आहे.

(४) ज्या लेखाशिर्षाखाली अनुदान वितरीत करण्यात येत आहे त्या लेखाशिर्षांतर्गत १ वर्षापासूनचे संक्षिप्त देयक प्रलंबित नाही. :- या योजनेखाली देयकांची संक्षिप्त देयके पारीत होत नाहीत.

(५) स्थानिक स्वराज्य संस्थांना अनुदान देताना त्यांचेकडून राज्य शासनास येणे नाही किंवा येणे रक्कम समायोजित करण्यात आली आहे :- लागू नाही.

(६) वैयक्तिक लाभार्थीचे देयक सादर करताना यादीसह व शक्यतो आधार क्रमांकासह सादर करावे :- याबाबत संबंधित जिल्हा उपनिबंधकांनी खात्री करावी.

(७) बांधकाम विषयक प्रस्तावांना प्रशासकीय मान्यता देताना सक्षम अधिकाऱ्याची मान्यता घेतल्याचा उल्लेख आदेशात करावा. :- लागू नाही.

(८) खरेदीविषयक प्रक्रिया अद्ययावत संबंधित शासन आदेशानुसार करावी व तसा उल्लेख प्रशासकीय मान्यतेत असावा :- लागू नाही.

(९) साहित्य खरेदीची रक्कम पुरवठादाराच्या नावे ECS द्वारे आहरित करावी :- लागू नाही.

७. सदर तरतूद संबंधित संस्थांना अदा करण्यासाठी सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे अधिनस्त अप्पर आयुक्त व विशेष निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना नियंत्रक अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. तसेच लेखाधिकारी, अधिन सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. सदर निधी आहरण करून हा खर्च किती वेळेत होईल हे सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी पहावे. तसेच याबाबतचा अहवाल व विकास मंडळनिहाय खर्चाची माहिती वेळो वेळी शासनास पाठवावी.

८. सदरहू रक्कम मागणी क्र.व्ही - २ मुख्यलेखाशिर्ष " २४२५ सहकार - (१०७), सहकारी संस्थांना सहाय्य (०२) (०४) डॉ.पंजाबराव देशमुख व्याज सवलत योजना (कार्यक्रम) (दत्तमत) (२४२५१००९) ३३ अर्थसहाय्य ", या लेखाशिर्षाखालील सन २०१८-१९ या वर्षासाठी उपलब्ध असलेल्या तरतूदीमधून खर्च करण्यात यावी.

९. सदर शासन निर्णय वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र. अर्थसं २०१८/प्र.क्र.६९/अर्थ-३, दि.२५/०१/२०१९ अन्वये प्रशासकीय विभागाला असलेल्या अधिकारांतर्गत निर्गमित करण्यात येत आहे.

१०. सदरचा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेतांक २०१९०२०६१८०३०३३१०२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने स्वाक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Ramesh Shankarrao Shingte

Digitally signed by Ramesh Shankarrao Shingte
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Cooperation, Marketing And Textile Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=fed1b2ed6e1e4aca719170d9eae8aa251ee28dc56c75d8a65acb34103d45bd48, serialNumber=b9bf7a534d8f1272bd902482bf95b556a5baefdddce18574a78fa2d8d0957d1f, cn=Ramesh Shankarrao Shingte
Date: 2019.02.06 18:04:51 +05'30'

**( रमेश शिंगटे )**

अवर सचिव तथा सहनिबंधक सहकारी संस्था

प्रत माहितीसाठी व योग्य त्या कार्यवाहीसाठी अग्रेषित :-

१. सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे.

२. महालेखाकार, महाराष्ट्र- १, मुंबई.

३. महालेखाकार, महाराष्ट्र- २, नागपूर.

४. समन्वयक, राज्यस्तरीय बँकर्स समिती, पुणे
५. कार्यकारी संचालक, महाराष्ट्र राज्य सहकारी बँक. लि. मुंबई.
६. कार्यकारी संचालक, सर्व सबंधित व्यापारी बँका.
७. सर्व विभागीय सहनिबंधक, सहकारी संस्था.
८. सर्व जिल्हा उपनिबंधक, सहकारी संस्था.
९. वित्त विभाग, व्यय-२/अर्थसंकल्प -१३ ,मंत्रालय, मुंबई
१०. अवर सचिव (कार्या १७ स), सहकार पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई
११. कोषागार अधिकारी, पुणे.
१२. निवड नस्ती-१८-स.